राज्यातील कृषी व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य. सन २०१५-२०१६ चे अनुदान (योजनेत्तर)

महाराष्ट्र शासन
ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन क्र.निधिवि-२०१५/प्र.क.६९/ऊर्जा-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १५ सप्टेंबर, २०१५

<u>संदर्भ</u> :-१) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.विपुअ-२०१२/ प्र.क्र.९१ / ऊर्जा-३,दिनांक .११/१०/२०१२

२) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टॅरिफ-२०१२/ प्र.क्र.९१भाग-२/ऊर्जा-३, दि.०५/०३/२०१३

३) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०१४/ प्र.क्र.२७८ (भाग-३)/ऊर्जा-५, दि.२२/१२/२०१४

४) व्यवस्थापकीय संचालक, वितरण यांचे पत्र क्र. व्यवस्थापकीय संचालक/ २७७६०,दि.१६/०७/२०१५

<u>प्रस्तावना</u> :-

राज्य शासनाकडून कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत देण्यात येते त्यासाठी सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षात रु.४९६२,६९,००,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद आहे. त्यापैकी रु.५३१,००,००,०००/- (पाचशे एकतीस कोटी फक्त) रोखीने महावितरण यांना वितरीत करण्यासंदर्भातील बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली अनुदानाची रक्कम रु.५३१,००,००,०००/- (रुपये पाचशे एकतीस कोटी फक्त) रोखीने वितरीत करण्यास या निर्णयाद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.राजुरकर, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ब.शे.मांडवे, उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रु.५३१,००,००,०००/- (पाचशे एकतीस कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

३. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील खर्चासाठी, "मागणी कृ.के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००)(०१) कृषी विषयक व यंत्रमाग विषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण/पारेषण अनुज्ञप्तीधारकांना अर्थसहाय्य (योजनेतर) (२८०१२६१५)३३ अर्थसहाय्य" या लेखाशीर्षाखाली रु.४९६२.६९ कोटी अर्थसंकल्पीय तरतूद आहे. अर्थसंकल्प अंदाज, वितरण व सनियंत्रण प्रणालीवर (अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ७०टक्के प्रमाणात) उपलब्ध झालेल्या

रु.३४७३.८८ कोटी तरतूदी पैकी रु २७७६.६० कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे. या लेखाशीर्षाखाली वितरणासाठी शिल्लक असलेल्या रु.६९७.२८ कोटी या तरतूदीतून सदर खर्च भागविण्यात यावा. प्रमाणित करण्यात येते की सदर खर्च धरुन आतापर्यंत वितरीत झालेली एकून निधी हा अर्थसंकल्पीय तरतूदीच्या (रु. ४९६२.६९ कोटीच्या) ७० टक्केच्या मर्यादेत आहे.

या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने निधी प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षीप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाण पत्र प्रलंबित नाही.

४. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने , महाराष्ट्र विनियोजन विधेयक २०१५/शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसंकल्प-२०१५/प्र.क्र.८५-अर्थ-३,दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र. ९ समोरिल तपासणी सुचीतील अटींच्या तसेच या परिपत्रकातील परिच्छेद अनु. क्र. ३ व ७ ते १८ मधील सर्व अटींची पूर्तता होत झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र विनियोजन विधेयक २०१५/शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसंकल्प-२०१५/प्र.क्र.८५-अर्थ-३,दिनांक १७ एप्रिल, २०१५ च्या सोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ या करीता वित्त विभागाच्या मंजुरीची आवश्यकता नाही.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या कृ. अर्थसं-२०१५/प्र.कृ.८५/अर्थ-३, दि.१७-४-२०१५ च्या परिपत्रकान्वये मंत्रालयीन विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात प्रधान सचिव (उर्जा) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०९१५११५७१६७११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas M Rajurkar
Date: 2015.09.15 12:01:01 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हाँगकाँग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५
४) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.

८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
१०) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
११) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१२) क.अ.अधिकारी (प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१४) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग,ऊर्जावकामगारविभाग,सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.